आदिवासी क्षेत्र उपयोजना/आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना
२०११-२०१२ चे जिल्हानिहाय व योजनानिहाय
अर्थसंकल्प तरतुदीचे वाटप **"अवर्षण प्रवण कार्यक्रम"**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.बीयुडी-२०११/प्र.क्र.१९/का.६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- २९ एप्रिल, २०११.**

**वाचा :** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.लेखानु -२०.११/प्र.क्र.६५/अर्थसंकल्प-३, दिनांक ३१.३.२०११
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.लेखानु -२०.११/प्र.क्र.३७/अर्थसंकल्प-४, दिनांक ८.४.२०११
३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक टिएसपी-२००८/प्र.क्र.६/का.६, दिनांक १६.१२.२००९.

**शासन निर्णय :-** आदिवासी उपयोजनांतर्गत **"अवर्षण प्रवण कार्यक्रम"** या उपशिर्षाखाली सन २०११-१२ च्या अर्थसंकल्पीय अंदाजपत्रकात समाविष्ट करण्यात आलेल्या तरतुदीचे योजनानिहाय वाटप आणि प्रत्येक योजनांचे नियंत्रण अधिकारी सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविले आहेत.

२. नियंत्रण अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निंश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व क्षेत्राबाहेरील मान्य योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

३. आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरिता वा आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लोकांकरिता खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये. जर आदिवासी उपयोजनेत केलेली तरतूद खर्च झाली नाही तर सदर तरतूद प्रत्यार्पित करावी व कोणत्याही परिस्थितीत आदिवासी क्षेत्राबाहेर खर्च करण्यात येवू नये. जर आदिवासी उपयोजनेची तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर खर्च झालेली आढळल्यास याबाबत आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, संबंधित जिल्हाधिकारी व नियोजन अधिकारी यांना जबाबदार धरण्यात येईल. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत जिल्हा योजनांसाठी उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल लेखाशिर्षनिहाय/उप लेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती जिल्हाधिकारी तसेच नियोजन अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास व आदिवासी विकास विभागस प्रत्येक महिन्यात १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

४. विभागाच्या दिंनाक १६ डिसेंबर, २००९ च्या शासन निर्णयाव्दारे जिल्हास्तरीय योजना जिल्हाधिकारी यांच्याकडे राबविण्यासाठी देण्यात आल्या आहेत. जिल्हा योजनांसाठी प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांना देण्यात आलेले असल्यामुळे योजनेसाठी केलेली तरतूद त्याच योजनेवर त्याच जिल्ह्यात खर्च करणे बंधनकारक राहिल. त्यानुसार जिल्हा योजनेसाठी केलेली तरतूद जिल्हाधिकारी यांच्याकडे सुपूर्द करण्यात आली आहे. तथापि, हाती घेण्यात येणारी कामे संबंधित विभागातील क्षेत्रिय अधिकारी यांनी जिल्हाधिकारी, आयुक्त,आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त व प्रकल्प अधिकारी यांचेशी चर्चा करुन निश्चित करावी. प्रगतीपथावरील (ongoing works ) कामांपैकी ज्यामध्ये ५० टक्के पेक्षा जास्त खर्च झालेला आहे त्यांच्यावर खर्च करावा. अपवादात्मक परिस्थितीत अशी

कामे ज्यावर ५० टक्के पेक्षा कमी खर्च झालेला आहे व त्यास पूर्ण करणे गरजेचे आहे त्याबाबत शासनाची पूर्व परवानगी घेऊन पुढील कार्यवाही करावी. तसेच जिहास्तरीय योजनेतील कामांची तपासणी करण्याचे अधिकार व जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी तसेच प्रकल्प अधिकारी, अपर आयुक्त व आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांची संयुक्तीकरित्या राहिल.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल व तो केंद्रशासनाला कळविता येईल.

६. नियंत्रण अधिकारी/विभाग प्रमुख यांनी नियम प्रचलित कार्यपध्दती व सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन चालू योजनांवर खर्च करावा. हे आदेश फक्त अंमलबजावणी /नियंत्रक अधिका-यांच्या अधिनस्त ठेवलेल्या तरतुदीस प्रशासकीय दृष्टया मान्य केलेल्या चालू योजनांवर खर्च करण्यासाठी आहे. याची अंमलबजावणी अधिका-यांनी नोंद घ्यावी.

**७. आदिवासी उपयोजनेअंतर्गत आदिवासी क्षेत्र उपयोजना (टिएसपी) व आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना (ओटिएसपी) यांचा खर्च स्वतंत्रपणे नोंदविण्यासाठी लेखाशिर्षामध्ये काही बदल करण्यात आले असल्यास हे बदल लक्षात घेवून खर्च नोंदविताना सुधारित लेखाशिर्ष नोंदविण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी.**

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा **संगणक सांकेतांक २०११०४२९११२७२१००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( श. र. सावंत )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
आयुक्त , आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/नागपूर/ठाणे/अमरावती.
जिल्हाधिकारी, नाशिक/ धुळे/ नंदुरबार/ अहमदनगर/ पुणे/अमरावती/यवतमाळ/चंद्रपूर/गडचिरोली/नांदेड.
**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (सर्व)**
जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती,नाशिक/ धुळे/ नंदुरबार/ अहमदनगर/ पुणे/ अमरावती/यवतमाळ/चंद्रपूर/गडचिरोली/नांदेड.
जिल्हा कोषागार अधिकारी,नाशिक/धुळे/नंदुरबार/अहमदनगर/पुणे/अमरावती/यवतमाळ/चंद्रपूर/गडचिरोली/नांदेड.
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.(प्रत्येकी ५ प्रती)
सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, (जल-२०), मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग (बजेट), मंत्रालय, मुंबई.
नियोजन विभाग(बजेट), मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अधिकारी (का.क्र. २, १४), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (का.-६), आदिवासी विकास विभाग.

**आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील सन २०११-१२ चे जिल्हानिहाय अंदाजपत्रकीय तरतूदीचे वाटप**

**टिएसपी** **(रुपये हजारात)**

| **शिर्ष :-** अवर्षण प्रवण<br>**योजनेचे नाव :- अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम.**<br>**(जिल्हास्तरीय योजना)** | | **मागणी क्रमांक :-** टी-५<br>**मुख्य लेखाशिर्ष :-** २५०१- विशेष ग्रामविकास कार्यक्रम- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०२-अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०१) अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम **(२५०१ ०३१५) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)** | | |
|---|---|---|---|---|
| **जिल्हयाचे नाव** | **२०११-१२ साठी केलेली तरतूद** | **२०११-१२ ची अर्थसंकल्पीय तरतुद सुपुर्द करण्यात आलेला नियंत्रण अधिकारी** | **प्रशासकीय विभाग** | **शेरा** |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| नाशिक | २०९६० | संबंधित जिल्हाधिकारी | ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई. | |
| धुळे | ३३०० | | | |
| नंदुरबार | १२९७३ | | | |
| अहमदनगर | ५९५४ | | | |
| पुणे | ३६०० | | | |
| अमरावती | ३६०० | | | |
| यवतमाळ | १२०३७ | | | |
| चंद्रपूर | १११७५ | | | |
| गडचिरोली | ७२४९ | | | |
| नांदेड | ३५०० | | | |
| **एकूण** | **८४३४८** | | | |